**दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर , कर्जत, जिल्हा अहमदनगर, यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.डीडीओ- ०४२४/३२१/प्र.क्र.११७/कार्यासन-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २९ एप्रिल, २०२४.

**वाचा :** १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक: न्यायस्था-०९१९/७२५/ प्र.क्र.१५६/ कार्यासन-११, दि.९.११.२०२२.
२. शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्रमांक: न्यायस्था-०९१९/७२५/ प्र.क्र.१५६/कार्यासन-११, दि.५.१२.२०२३.
३.जिल्हा न्यायालय, अहमदनगर यांचे पत्र जा.क्र. लेववि-१३७६५/२०२३, दि.१६.१२.२०२३.
४. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, कर्जत, जिल्हा अहमदनगर यांचे जा.क्र.-०७/२०२३, दि.२३/०८/२०२३.

**प्रस्तावना** :

अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत येथे दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर हे न्यायालय स्थापन करण्यास व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील अधिसूचनेन्वये सदर न्यायालय १०/१२/२०२३ पासून कार्यान्वित झाले आहे. जिल्हा न्यायालय, अहमदनगर व दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर, कर्जत, जिल्हा अहमदनगर यांनी संदर्भ क्र.२ व ३ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, कर्जत, जि.अहमदनगर यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत येथील दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर या न्यायालयासाठी दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, कर्जत, जि. अहमदनगर यांना **"कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्यासाठी त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ मधील भाग - पहिला, उप विभाग एक, अ.क्र.३, नियम क्र.२ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२९१६३३२८२११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2024.04.29 16:46:18 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १),मा. उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा अहमदनगर
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर , कर्जत, **जि.अहमदनगर**
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.अहमदनगर
६) उप कोषागार अधिकारी, कर्जत, जि. अहमदनगर
७) कक्ष अधिकारी, कार्या.२३/२०,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी, कोषा - (प्रशा-५)/विनियम/ व्यय-५, वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.